पं. दिनदयाळ उपाध्याय यांच्या जीवनावर आधारीत सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यास व त्यावर येणाऱ्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२५/प्र.क्र.२१५/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०२५

**संदर्भ :-** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२५/ प्र.क्र.२१५/सां.का.४, दि. २५ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना :-**

सांस्कृतिक कार्य विभागामार्फत कला व कलेशी संबंधित मान्यवरांच्या हिरक, सुवर्ण व शताब्दी वर्षाच्या औचित्यावर त्यांचा गौरव व्हावा आणि त्या कलाकृतींचा तरुण रंगकर्मींच्या माहितीसाठी प्रचार व प्रसार व्हावा या हेतूने त्यांच्या संबंधीचे सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येत असते. याच पार्श्वभुमीवर, पं. दिनदयाळ उपाध्याय यांच्या जीवनावर आधारीत सांस्कृतिक कार्यक्रम आयोजन करण्यास व त्यावरील खर्चास उपर्निर्दिष्ट सदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता सदर कार्यक्रम आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पं. दिनदयाळ उपाध्याय यांच्या जीवनावर आधारीत सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन व त्यावरील आयोजन खर्च रुपये ५,००,०००/- ( अक्षरी रुपये पाच लक्ष फक्त ) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (०२)(०२),जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (२२०५ १५०७)-५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका

१९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०७ एप्रिल, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६०२१७५१५१४५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.06.02 17:53:07 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२ अपर मुख्य सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३ उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४ संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२.
५ कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७ महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९ महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१० अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२ निवड नस्ती, सां.का.४